# बटाटेवाला

मेगन, चित्र : टेड, मराठी : अश्विनी बर्वे



बटाटेवाल्याला फक्त एकच डोळा होता, आणि त्याचा चेहरा एका मोठ्या बटाट्याशी मिळताजुळता होता.

बटाटेवाल्याचा चेहरा जरूर घाबरवणारा होता, पण असे वाटत होते की त्याचे नशीबच खराब आहे. ज्या दिवशी बटाटेवाला आपली घोडा-गाडी घेवून पहिल्यांदा आमच्या गल्लीत आला, त्या दिवसापासून मुलं त्याची चेष्टा करत, खोड्या काढत होते. ते मागून त्याच्यावर दगड फेकू लागले आणि त्याच्या गाडीतून खाली पडलेल्या बटाट्याची चोरू करू लागले, की चोरी करने लगे.

पण सगळ्यात भीतीदायक दिवस ख्रिसमसच्या पहिल्या दिवशी आला. या पुस्तकात तुम्हांला अमेरिकेच्या जुन्या इतिहासाची झलक मिळेल. त्याचबरोबर एका कुरूप माणसाचा उदारता तुम्हांला जाणवेल.

# बटाटेवाला

मेगन, चित्र : टेड, मराठी : अश्विनी बर्वे



“बघा, हे सगळं असं सुरु झालं,” आजोबांनी सांगायला सुरुवात केली.

“मी आणि ओटो रस्त्यावर लपालपी खेळत होतो, तेव्हाच आम्ही पहिल्यांदाच एक बटाटे विकणारा पाहिला. त्याला फक्त एकच डोळा होता आणि हो त्याचा चेहरा बिलकुल बटाट्यासारखा फुललेला होता.”





त्या काळी ईस्ट स्ट्रीटवर खूप फेरीवाले वस्तू विकायला, नाहीतर वस्तूंची दुरुस्ती करायला येत असत. तुम्ही तुमच्या घराच्या दारासमोरच वस्तू विकत घेवू शकत, किंवा दुरुस्त करून घेवू शकत.

जेव्हा कधी मला आवाज ऐकू येत असे, “चाकुला धार लावा, कात्रीला धार लावा.” तेव्हा मी स्वयंपाक घरातून चाकू घेवून पळत बाहेर जाई आणि मोठ्या उत्सुकतेनं चाकुला धार लावतांना बघत असे. सगळ्यात जास्त मजा मला दगड जोरात फिरत असे ते बघायला येई आणि दगडावर घासल्याने जेव्हा ठिणग्या पडत असत, तेव्हा तर माझा आनंद गगनात मावत नसे.



मला सगळ्यात जास्त मजा एका संगीततज्ञा बरोबर येई. त्याच्याजवळ एक मशीन होते. जेव्हा तो त्याचे हंडल फिरवे तेव्हा त्या मशीनमधून, “पॉप गोज द विजील,” या गाण्याची धून वाजे. गाणे वाजत असे तेव्हा संगीततज्ञाचा पोपट आपल्या भविष्याचे पाकीट आणून आपल्याला देत असे.

*तुम्ही तुमच्या कामात तीन वेळा यशस्वी व्हाल!*



तो दिवस अजून माझ्या लक्षात आहे जेव्हा ‘भविष्यवाणी’ चे पाकीट प्रथम माझ्या हातात आले. खरं तर त्या दिवशी मी तीन वेळा असफल आणि कमनशिबी ठरलो होतो. त्याच दिवशी प्रथम बटाटे विकणारा आम्ह्या गल्लीत आला होता, तो घोडागाडीवर स्वार होऊन आला होता.

तो घोड्याची लगाम ओढत होता आणि चाबूक हलवत जोर-जोरात ओरडत होता, “बटाटे घ्या.”



कदाचित म्हणून त्याचे नाव बटाटेवाला पडलं असेल. तो एक नवीन फेरीवाला होता, जो आपल्या गाडीत फळं आणि भाज्या विकायला येत असे. सफरचंद, बटाटे, बीट, आणि कोबी याचे त्याच्या गाडीत ढीग असायचे.

“बटाटे घ्या!” तो जोरात ओरडे.

त्याचा आवाज ऐकून माझा कुत्रा एवढ्या जोरात भुंकला की त्याची साखळी तुटता-तुटता राहिली. माझ्या बहिणी दोरीवर उड्या मारत होत्या आणि त्याबरोबर एक गाणं सुद्धा म्हणत होत्या.

पण जेव्हा त्यांनी बटाटेवाल्याच्या डोळ्याकडे पाहिले आणि घाबरून त्या पळत घरी आल्या.





मी पण घाबरून अवजारं ठेवतो त्या खोलीत लपून बसलो. आई नेहमी मला चार केळी आणण्यासाठी पैसे देई. पण त्यादिवशी मी केळी खरेदी केली नाही. मी फक्त अवजाराच्या खोलीत लपून बसलो. आणि पत्र्यावर पडणाऱ्या पावसाचा टप-टप आवाज ऐकत राहिलो.

रस्त्यावरच्या खोडकर मुलांनी बटाटेवाल्याला चिडवायला सुरुवात केली. जेव्हा कधी तो येई तेव्हा मुलं ओरडत “इथून पळ बटाटेवाल्या” नंतर ते त्याच्या गाडीचा पाठलाग करत आणि मागून झाडाच्या फांद्या आणि लहान दगड फेकून मारत.

त्या नंतर कमनशिबाचा काळ सुरु झाला.



एक दिवस योगायोगाने बटाटेवाल्याच्या गाडीत ठेवलेले बटाटे घसरून जमिनीवर पडले. मी आणि ओटोने त्या बटाट्यांना उचलून खिशात लपवून ठेवले. मग आम्ही दोघांनी मिळून अवजारांच्या खोलीजवळ शेकोटी पेटवली. आणि त्या बटाट्या मध्ये काडी खुपसून भाजले.

“आपण ते बटाटे उचलायला नको होते,” ओटो म्हणाला, “ही तर सरासर चोरी आहे.”

“तो बटाटेवाला अर्धा आंधळा आहे, त्याने आपल्याला बटाटे उचलतांना पाहिले नसेल,” मी ओटोला म्हटले.

“नाही, बटाटेवाल्याने मला पाहिले होते आणि त्याने माझ्या आईकडे माझी तक्रार केली. आईने मग मला चांगी शिक्षा दिली - पुढच्या आठवड्याभर बटाटे सोलण्याचे काम मला दिले.”



दुसऱ्या वेळी मी आणखीन एक खोडी काढली, जेव्हा माझी बहीण दुसरीकडे बघत होती, तेव्हा मी पूर्ण संत्र तिच्या केसात पिळले. त्यानंतर माझी बहीण ओरडत घराच्या बाहेर पळाली. तिच्या भोवती सगळ्या माश्या घोंगावू लागल्या. बटाटेवाल्याने आपल्या गाडीत बसून ही घटना पूर्ण पाहिली..

आईने माझ्या त्या खोडीसाठी सुद्धा चांगली शिक्षा केली. पण तरीही मी खोड्या काढणे सोडले नाही. जेव्हा मला संधी मिळे तेव्हा मी माझ्या बहिणीला चिडवत असे.



मानहानी होण्याची ही आत्तापर्यंतची दुसरी वेळ होती.

त्यानंतर एक दिवस मी आणि ओटो, शेजारच्या शेफर साहेबांच्या गॅरेजवर चढून त्यांची चमकणारी नवी स्टेनले कार बघत होतो.

तेव्हा जोराचा आवाज आला, “बटाटे घ्या!” आवाज ऐकून मी एकदम घाबरलो. त्यामुळे माझा पाय घसरला आणि त्यामुळे शेफर साहेबांच्या गॅरेजची खिडकी तुटली.

अशाप्रकारे मी तीन वेळा कमनशिबी ठरलो.

“होवू शकतं की ही तुझ्या कमनशिबाचा शेवट असेल,” ओटो मला दिलासा देत म्हणाला.

“आता हिवाळा येत आहे. आणि बटाटेवाल्याचे थंडीमुळे येणे – जाणे थांबेल.”

त्यानंतर जोरात बर्फ पडू लागला. मी आणि ओटो बाहेर बर्फाचे तुकडे पकडट होतो. तेव्हाच आमचा कुत्रा डूकी जोरात भुंकू लागला.

जेव्हा आम्ही जवळ येवून पाहिले तेव्हा डूकने आपल्या तोंडात एक लाल चेंडू पकडला होता. मला वाटले की, की तो चेंडू बटाटेवाल्याचा आहे.

"चेंडू सोड डूकी! लवकर सोड!" मी ओरडलो. "लवकर मला चेंडू दे!" मी डूकीजवळ येवून म्हणालो. डूकीने माझ्या हातात चेंडू दिला.

पण तो चेंडू नव्हता. लाल रंगाचे सफरचंद होते.

मला आजूबाजूला डाळिंबा बरोबरच काही फळं सुद्धा दिसली. मला वाटलं की ती सगळी फळं त्या बटाटेवाल्याची आहेत..





तीन वेळा मानहानी झाल्यामुळे मी शिकलो होतो. म्हणून मी सरळ बटाटेवाल्या जवळ गेलो आणि मी त्याच्या डोळ्यात डोळे घालून पाहिले.

त्याच्या डोळ्यांची उघडझाप झाली, त्याने आपली लोकरीची टोपी मागच्या बाजूला ओढली आणि त्याचा पूर्ण चेहरा लाल झाला, तो माझ्यावर शिव्यांची लाखोली वाहिल असेच वाटू लागले.

“हे तुमचे आहे?”मी त्याला लाल सफरचंद परत करत म्हटलं.

“नाही बाळा,” बटाटेवाल्याने भरल्या गळ्याने म्हटले. त्याचा डोळा बंद होवून पटकन उघडला. “मला वाटते की हे सफरचंद तुझे आहे. तुला ख्रिसमसच्या शुभेच्छा.”



त्यानंतर बटाटेवाल्या त्याच्या घोडागाडीत परत स्वार झाला आणि परत चाबूक फटकारत तिथून दिसेनासा झाला.

मग कडाक्याची थंडी पडू लागली आणि मग कितीतरी काळ आम्हांला बटाटेवाला दिसला नाही..



“आजोबा त्या बटाटेवाल्याची गोष्ट आम्हांला परत सांगा. तो परत आला का? तुम्ही परत त्याला पाहिले का?”

“त्या बटाटेवाल्याचे नाव मिस्टर अन्जेलो. पुढच्या वंसतात तो परत आला. जितकं मला आठवतं त्यात तो प्रत्येक वसंतात परत यायचा. आमच्या गल्लीत फळं आणि भाज्या विकत असे. एकदा त्याने मला खूप मोठा आणि जड भोपळा विकला होता.एवढा मोठा भोपळा लोकांनी कधीच पाहिला नव्हता.”

“आम्हांला त्याच्या विषयी सांगा, तुमच्या लहानपणाच्या गोष्टी सांगा ना.”

“आजच्या रात्रीपुरते एवढं पुरे, उद्या जरूर नवीन गोष्ट सांगेन.”



